राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जळगांव जामोद प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेअंतर्गत ॲटोमॅटीक फ्लो कंट्रोल व्हॉल्व व अल्ट्रासॉनिक फ्लो मिटर्सच्या अतिरिक्त कामांच्या खर्चाला मंजूरी देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२११८/ प्र.क्र. १५६/पापु-१३**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः २० जून, २०१८.**

वाचा -

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक ग्रापापु-२०१२/प्र.क्र. २२/पापु-१३, दिनांक २/१२/२०१३.
२) अधिक्षक अभियंता (यांत्रिकी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर यांचे पत्र क्र. एसई/ एम/ एमजेपी/ नागपूर/टीबी(एम)/२५६/२०१७, दिनांक २६/४/२०१७ चे पत्र.
३) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अकोला यांची तांत्रिक मान्यता बाब क्र. २४, फेब्रुवारी, २०१८.
४) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अकोला यांचे पत्र क्रमांक मजीप्रामं /तांशा-२/१२९३/१८, दि. २७/४/२०१८.
५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दि.१५/०६/२०१५ व दि.१४ मार्च, २०१६.

**प्रस्तावना**

बुलडाणा जिल्हयातील जळगांव जामोद व १४० गावांच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. जळगांव जामोद व संग्रामपूर, जि. बुलडाणा या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु. २२२.२३ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. सदर योजनेच्या करारनाम्यात ऑटोमेशन व स्काडा अंतर्गत १४० जलकुंभांच्या मॅनेजमेंटसाठी ढोबळ स्वरुपात तरतूद आहे. या ॲटोमेशनच्या कामात बटरफ्लाय व्हॉल्व व त्याच्या ॲक्च्युएटरचा समावेश होता. परंतु, त्याऐवजी त्याच किंमतीत अत्याधुनिक पद्धतीचा ॲटोमॅटीक फ्लो-कंट्रोल व्हॉल्व

लावण्याबाबतचा प्रस्तावास अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (यांत्रिकी) यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये मान्यता दिलेली आहे. यामध्ये एकूण ९० गावातील अस्तीत्वातील टाक्या व ५० गावात नविन टाक्यांसाठी हे व्हॉल्व बसविण्याचे नियोजन होते. त्यानुसार १४० गावांत ॲटोमॅटीक फ्लो-कंट्रोल व्हॉल्व बसविणे आवश्यक आहे. तथापि, काही गावात प्रत्यक्षात २ टाक्या अस्तित्वात आहेत, तर काही गावात टाक्यांची उपलब्धता नाही.

३. वरील सर्व बाबींचा विचार करता, या योजनेत एकूण १४० गावांसाठी एकूण १५७ व्हॉल्वची आवश्यकता आहे. त्यामुळे, उर्वरीत जास्तीचे १७ नग फ्लो-मिटर व १७ नग फ्लो-कंट्रोल व्हॉल्व बसविण्यासाठी अतिरिक्त बाबीचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे सदर कामाच्या अंदाजपत्रकाची एकूण किंमत रु. १,१६,९६,७६४/- इतकी असून, सदर अतिरिक्त कामाच्या अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, म.जि.प्रा. मंडळ, अकोला यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

४. प्रस्तुत मूळ योजनेच्या अंदाजपत्रकानुसार रु. २२२.२३ कोटी इतक्या किंमतीच्या योजनेस मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, सदर योजनेवर रु. १६३.९२ कोटी इतका खर्च झालेला आहे. तसेच उर्वरीत कामे पुर्ण करीता रु. ५३.९२ कोटी इतका खर्च गृहीत धरुन, योजनेवर एकूण रु. २१७.८४ कोटी इतका खर्च होणार आहे. त्यामुळे योजनेवर रु. ४.३९ कोटी इतकी बचत होत आहे.

५. त्यामुळे सदर योजनेच्या बचतीमधून प्रस्तावित जास्तीचे १७ नग फ्लो-मिटर व १७ नग फ्लो-कंट्रोल व्हॉलव बसविणे या कामाकरीता लागणारी रक्कम रु. १,१६,९६,७६४/- (ईटीपी सह) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता मिळण्याबाबत अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अकोला यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय

जळगांव जामोद व १४० गावांच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेअंतर्गत एकूण १४० गावांसाठी एकूण १५७ व्हॉल्वची आवश्यकता असल्याने, जळगांव जामोद व १४० गावांच्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या मूळ मंजूर योजनेतील बचतीतून, उर्वरीत १७ नग फ्लो-मिटर व १७ नग फ्लो-कंट्रोल व्हॉल्व बसविण्यासाठी रु. १,१६,९६,७६४/- (ढोबळ) (**अक्षरी एक कोटी सोळा लक्ष शहाण्णव हजार सातशे चौसष्ट फक्त**) एवढ्या इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१) प्रस्तुत कामाच्या स्वतंत्र निविदा काढण्यात याव्यात. प्रस्तुत कामाच्या विहीत पद्धतीने ई-निविदा मागविण्यात याव्यात. व जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करु नयेत.

२) प्रस्तावित कामाकरीता होणारा खर्च मंजूर योजनेच्या बचतीतूनच करण्यात यावा.

३) प्रस्तावित कामे करताना काही तांत्रिक बदल झाल्यास शासनाची मंजूरी घेण्यात यावी.

५) प्रस्तावित योजनेच्या अतिरिक्त कामांना दिलेल्या तांत्रिक मंजूरी आदेश बाब क्र. २४, माहे फेब्रुवारी, २०१८ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

६) दिनांक १५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर वाढीव कामासाठी त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे आवश्यक राहील.

७) प्रस्तावित कामाच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जाबबदार संबंधीत अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

२. प्रस्तुत कामांवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२०१०१७५४१६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.06.20 15:10:50 +05'30'

**( वसंत भि. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी,बुलडाणा.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.

८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अकोला.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती
१४) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा.
१५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, बुलडाणा.
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा.
१७) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१७,१८, १९ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.